**निसर्ग संरक्षण व वन्यपशू संवर्धन, व्याघ्र प्रकल्प मेळघाट या योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या १०४ अस्थायी पदे सन २०२५-२६ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी-०३.२५/प्र.क्र.८२/भाग-६/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०३.०४.२०२५.

**वाचावे :-**

१. शासन निर्णय, महसूल व वनविभाग, क्रमांक : एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दिनांक १३.०९.२०१९.
२. शासन निर्णय, महसूल व वनविभाग, क्रमांक : एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दिनांक २१.०९.२०२१.
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक : डब्ल्युएलपी ०४.२४/प्र.क्र.८२/फ-१, दिनांक १०.०४.२०२४.
४. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक : डब्ल्युएलपी ०४.२४/प्र.क्र.८२/फ-१ दिनांक २५.०९.२०२३.
५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५.
६. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-३/योजनेत्तर/ प्र.क्र.०४(२४-२५)/५४५/२५-२६, दिनांक १४.०२.२०२५.

**प्रस्तावना:-**

निसर्ग संरक्षण व वन्यपशू संवर्धन, व्याघ्र प्रकल्प मेळघाट या योजनेत्तर योजनेखाली निर्माण केलेल्या १०४ अस्थायी पदांना सन २०२४-२५ मध्ये संदर्भ क्रमांक ३ व ४ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०३.२०२४ ते दिनांक २८.०२.२०२५ पर्यंत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजुरी प्रदान करण्यात आली आहे.

२. आता, संदर्भ क्रमांक ६ च्या पत्रान्वये उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी निसर्ग संरक्षण व वन्यपशू संवर्धन, व्याघ्र प्रकल्प मेळघाट या योजनेत्तर योजनेखाली निर्माण केलेल्या १०४ अस्थायी पदांना सन २०२५-२६ मध्ये दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक २८.०२.२०२६ पर्यंत चालू ठेवण्याबाबत प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

३. प्रशासकीय विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२६ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्रमांक ५ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये निसर्ग संरक्षण व वन्यपशू संवर्धन, व्याघ्र प्रकल्प मेळघाट या योजनेत्तर योजनेखाली निर्माण केलेल्या १०४ अस्थायी पदांना सन २०२५-२०२६ मध्ये दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. निसर्ग संरक्षण व वन्यपशू संवर्धन, व्याघ्र प्रकल्प मेळघाट या योजनेत्तर योजनेखाली निर्माण केलेल्या १०४ अस्थायी पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च "२४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर), ०२ पर्यावरणीय वनीकरण आणि वन्यजीव, ११० वन्यजीवन संरक्षण, (००) (०१) निसर्ग संवर्धन व वन्य पशु संरक्षण (२४०६ ०७६६)" या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : असंक - १००४ / प्र.क्र.१२ /(भाग-२) /२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ व वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४०३१८११९८७११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UDAY
CHANDRAKANT
DHAGE

Digitally signed by UDAY CHANDRAKANT DHAGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=d50c7e8b1126d276bbe49105f9d24fff67dc9032e4afab15f5d0d94a0ea6cf5a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=097E903F6E5707A0A9A3CDAEBE40C9235E8FDA1EE2C8C4EA7713D6497937DCED, cn=UDAY CHANDRAKANT DHAGE
Date: 2025.04.03 18:12:08 +05'30'

**(उदय ढगे)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

प्रति,

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. वनसंरक्षक व क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
६. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवड नस्ती ).

शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक डब्ल्यूएलपी ०३.२५/प्र.क्र.८९/फ-१,
दिनांक :- ०३.०४.२०२५ सोबतचे विवरणपत्र.

(दिनांक :- ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ दिलेली पदे)

| **अ.क्र.** | **पदाचे नाव** | **पदसंख्या** |
|---|---|---|
| १ | मुख्य वनसंरक्षक व क्षेत्रसंचालक | १ |
| २ | उपवनसंरक्षक | १ |
| ३ | मुख्य लेखापाल | १ |
| ४ | लिपिक | १ |
| ५ | संशोधन सहा.वनपाल | १ |
| ६ | वाहनचालक | ४ |
| ७ | महावत | २ |
| ८ | वनक्षेत्रपाल | २ |
| ९ | वनपाल | १५ |
| १० | वनरक्षक | ६६ |
| ११ | नाईक | १ |
| १२ | शिपाई | ३ |
| १३ | चौकीदार | ३ |
| १४ | सफाई कामगार | ३ |
| **एकूण** | | **१०४** |

***********